


महाराष्ट्र शासन

# वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश



भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई

१९८५

## वाणिज्यशास्त्र उपसमिती

**अध्यक्ष**

श्री. वा. कृ. चोरघडे, नागपूर विद्यापीठ

**प्रतिनिधि-सदस्य**

प्राचार्य मो. स. गोसावी, पुणे विद्यापीठ
डॉ. नी. गं. बापट, मराठवाडा विद्यापीठ
प्राचार्य प्र. शा. कुऱ्हाडे, शिवाजी विद्यापीठ
प्राचार्य बा. र. रायरीकर, मुंबई विद्यापीठ
श्री. ज्ञा. र. खैरे, माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
सौ. अनसूयाबाई वाडेगावकर, मराठी विज्ञान परिषद, मुंबई

**सदस्य-सचिव**

डॉ. न. व. पाटील, भाषा संचालक

## प्रकाशित झालेले परिभाषा कोश

१) वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश

२) समाजशास्त्र परिभाषा कोश

३) रसायनशास्त्र परिभाषा कोश

४) भौतिकशास्त्र परिभाषा कोश

५) शिक्षणशास्त्र परिभाषा कोश

६) गणितशास्त्र परिभाषा कोश

७) शारीर परिभाषा कोश

८) भूशास्त्र परिभाषा कोश

९) तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र परिभाषा कोश

१०) ग्रंथालयशास्त्र परिभाषा कोश

११) यंत्र अभियांत्रिकी परिभाषा कोश

१२) स्थापत्य अभियांत्रिकी परिभाषा कोश

१३) विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश

१४) जीवशास्त्र परिभाषा कोश

१५) कृषिशास्त्र परिभाषा कोश

१६) शरीरक्रियाशास्त्र परिभाषा कोश

# प्रस्तावना

महाराष्ट्रातील विद्यापीठांमध्ये शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हे आता सर्वमान्य झाले आहे. हे उच्च शिक्षण मराठीतून घेता यावे म्हणून विद्यापीठांत शिकवली जाणारी क्रमिक पुस्तके व अन्य संदर्भ-ग्रंथ मराठीत असणे अत्यंत आवश्यक आहे. संदर्भ-ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे हे काम महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिति मंडळाने व महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिति मंडळाने हाती घेतले असून महाराष्ट्राच्या सर्वच विद्यापीठांतील नामवंत प्राध्यापक मंडळी विविध विषयांवर सध्या ग्रंथ लिहीत आहेत.

शास्त्रीय विषयांवरील या ग्रंथांसाठी एकरूप परिभाषा असावी आणि ही परिभाषा केंद्र सरकारने अखिल भारतीय स्तरावर विकसित केलेल्या विज्ञान शब्दावलीशी——मराठी भाषेच्या प्रकृतीशी व प्रवृत्तीशी विरोध न येईल अशी दक्षता बाळगून मिळती जुळती असावी असे धोरणही महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांनी मान्य केले आहे. ही एकरूप शास्त्रीय मराठी परिभाषा विकसित करण्याचे काम महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने भाषा संचालनालय करील असे शासनाने व आंतरविद्यापीठ मंडळाने ऑक्टोबर १९६७ मध्ये ठरवले होते. त्याअनुसार भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांतील वेगवेगळ्या विषयांच्या परिभाषाविषयक उपसमित्या स्थापन केल्या व काही निदेशक तत्त्वे ठरवून परिभाषा निर्मितीच्या या कामास सुरुवात केली. आतापर्यंत समाजशास्त्र, वाणिज्यशास्त्र, रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, गणितशास्त्र, भूशास्त्र, शारीर, शिक्षणशास्त्र, स्थापत्य अभियांत्रिकी, यंत्र अभियांत्रिकी, विद्युत अभियांत्रिकी, जीवशास्त्र, कृषिशास्त्र व शरीरक्रियाशास्त्र या शास्त्रांचे परिभाषा कोश प्रसिद्ध करण्यात आले आहेत.

वाणिज्यशास्त्र परिभाषा निर्मितीचे काम एप्रिल १९६९ ते ऑक्टोबर १९७१ या कालावधीत पूर्ण करण्यात आले. याकरिता भाषा सल्लागार मंडळांतर्गत वाणिज्यशास्त्र उपसमितीच्या एकूण ३५ बैठकी घेण्यात आल्या आणि जवळजवळ ८,००० पारिभाषिक शब्द तयार करण्यात आले.

प्रस्तुत कोशाची ही दुसरी आवृत्ती वाचकांच्या हाती देताना मला आनंद होत आहे. या आवृत्तीत अर्थशास्त्रातील काही नवीन शब्दांची भर घातली आहे. वाणिज्यशास्त्रीय ग्रंथलेखन करणाऱ्यांना व समाजविज्ञानातील विविध शाखांचे अध्ययन व अध्यापन करणाऱ्यांना प्रस्तुत कोश उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

शास्त्रीय परिभाषा ही सतत विकसित होत असते. या परिभाषेचा जाणत्यांनी आपुलकीने विचार व वापर करावा व त्यांच्या नजरेस येणाऱ्या उणीवा वा ती सुधारण्याच्या दृष्टीने काही सूचना करावयाच्या असल्यास त्या भाषा संचालनालयाकडे अवश्य पाठवाव्या अशी विनंती आहे.

**न. ब. पाटील,**

भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य.

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली ‘निदेशक तत्त्वे’

शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा निर्मिती करताना केंद्र सरकारने जी तत्त्वे प्रमाणभूत म्हणून स्वीकारली ती सर्वांनाच मान्य होण्यासारखी आहेत. मराठी परिभाषा निर्मितीसाठी हीच तत्त्वे निदेशक तत्त्वे म्हणून स्वीकारण्यात आली आहेत. ती पुढीलप्रमाणे :

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ व इतर विज्ञान संस्था यांनी तयार केलेले शब्दसंग्रह व प्रचलित पर्याय हेही विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—‘आंतरराष्ट्रीय संज्ञा’ या शक्यतोवर त्यांच्या इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे. आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणतः पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे, वगैरेंसह) यांची नावे. ही नावे लिप्यंतरित करून देताना नावांपुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत.

जसे.—हायड्रोजन (H), कार्बन (C).

मात्र मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जसेच्या तसेच ठेवावेत.

जसे.—किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानीय $90th^{228}$, निकोटीन $C_{10}H_{14}N_2$.

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून पुढीलप्रमाणे द्यावीत :—




गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे, इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच ठेवावेत; परंतु रासायनिक संयुगांची नावे देताना ती त्यांच्या प्रचलित नावांप्रमाणेच द्यावीत.

(ब) वजने, मापे आणि परिमाणे. जसे.—कॅलरी, अॅम्पिअर, वगैरे.

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात.

जसे.—फॅरनहीट श्रेणी (फॅरनहीट), व्होल्टमीटर (व्होल्टा), अॅम्पिअर (अॅम्पिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे, वगैरे.

जसे.—Sin., Cos., Tan., Log.

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत.

जसे.—ऑक्सिजन–प्राणवायु, कॅलरी–ऊष्मांक, Sin.–ज्या, Cos.–कोज्या, वगैरे.

तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि, संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. "Cm." म्हणजे "सेंटिमीटर" या संज्ञेचा संक्षेप सें. मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यांवर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसाधारणपणे वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत.

जसे.—मशीन, इंजिन, मीटर, लिटर, वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपात द्यावेत.

८. **मिश्र शब्दांची निर्मिती.**—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना Pasteurisation "पाश्चरीकरण", Voltage "व्होल्टता" अशांसारखे मिश्र शब्द बनवणे हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समान अर्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन मराठी पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

# कोश परिचय

कोशाची रचना पुढीलप्रमाणे आहे :—

इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम :—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chamber's Twentieth Century Dictionary व Webster's New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा वर्णलेखन (spelling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

इंग्रजी शब्दजाती :—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे. (जसे :—*n.*; *adj.*; *v.t.*; *v.i.* इ.) इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविलेली नाही.

विषयनिर्देशक संक्षेप :—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शविणारा संक्षेप इंग्रजी इटॅलिक मुद्राक्षरात दिला आहे.

पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायापूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसांत, "as in :" असे देऊन त्या पर्यायाचा उपयोग करून दाखवला आहे.

मराठी शब्दजाती :—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शविली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शविली नाही.

लिंगनिर्देश :—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिच्या जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायापुढे लिंगनिर्देश केला आहे. (३) इंग्रजी अनेकवचनी जोडशब्दाच्या मराठी पर्यायापुढेही लिंगनिर्देश केला आहे.

शब्दकुळे :—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यांतील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवितात. असे शब्द त्यातल्या महत्त्वाच्या शब्दाखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तेथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृ. १ वरील abandon किंवा abate ही कुळे पहावी. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

जोडसंज्ञा :—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शविणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृ. २ वरील acceptance ही संज्ञा पहावी. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

समानार्थी शब्द :—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शविण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दा-समोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (*also*) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शविला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर = अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शविला आहे. त्याचप्रमाणे इंग्रजी शब्दाच्या वर्णलेखनात (spelling) थोडा फेरफार असलेले इंग्रजी शब्दही कंसात (*or*) असे देऊन दर्शविण्यात आले आहेत.

# संक्षेप सूची

| | |
|---|---|
| *abbr.* .. | abbreviation. |
| *acctt.* .. | Accounts. |
| *adj.* .. | adjective. |
| *adv.* .. | adverb. |
| *Agric.* .. | Agriculture. |
| *Bank.* .. | Banking. |
| *cf.* .. | compare. |
| *constr.* .. | construction. |
| *Econ.* .. | Economics. |
| e.g. .. | for example. |
| esp. .. | especially. |
| *Fig.* .. | figurative; figuratively. |
| *Geog.* .. | Geography. |
| *Geom.* .. | Geometry. |
| i.e. .. | that is. |
| in comb. | in combination with other words. |
| *Intern. Law* | International Law. |
| *Intern. Trade* | International Trade. |
| *Lit.* .. | literally. |
| *Mach.* .. | Machinery. |
| *Math.* .. | Mathematics. |
| *Mech.* .. | Mechanics. |
| *n.* .. | noun. |
| *oft.* .. | often. |
| *pa. p.* .. | past participle. |
| *pfx.* .. | prefix. |
| *pl.* .. | plural. |
| *pred.* .. | predicative. |
| *prep.* .. | preposition. |
| *pron.* .. | pronoun. |
| *sing.* .. | singular. |
| *specif.* .. | specifically. |
| *Stat.* .. | Statistics. |
| *Stock-exch.* | Stock-exchange. |
| *suff.* .. | suffix. |
| *Text.* .. | Textiles. |
| usu. .. | usually. |
| *vb.* .. | verb. |
| *v.i.* .. | verb, intransitive. |
| viz. .. | namely. |
| *v.t.* .. | verb, transitive. |
| *v.t. & i.* .. | verb, transitive and intransitive. |
| *w.r.t.* .. | with reference to. |
| अ.व. .. | अनेकवचन. |
| न. .. | नपुंसकलिंग. |
| पु. .. | पुल्लिंग. |
| सा. .. | सामान्य लिंग. |
| स्त्री. .. | स्त्रीलिंग. |

# वाणिज्यशास्त्र परिभाषा कोश

# A

**A1,** *adj.* (of the highest quality) **अत्युत्कृष्ट, प्रथम श्रेणीचा, नंबर एक**

**AAR,** (*abbr.* of "against all risks") **स. जो.** (सर्व जोखमी)

**AAR policy, स. जो. विमापत्र** (सर्व जोखमी विमापत्र)

**abandon,** *v.t.* **परित्याग करणे**
*cf.* relinquish सोडून देणे
surrender प्रत्यर्पित करणे

**abandonee,** *n.* **त्यक्तग्राही** (सा.)

**abandonment,** *n.* (the goods that have been insured may be abandoned if their actual loss appears to be unavoidable or if the cost of repairing the damage will exceed their value) **परित्याग** (पु.), **परित्याग करणे** (न.)

**abate,** *v.t. & i.* **घटणे**
*cf.* decrease कमी करणे, कमी होणे
diminish ऱ्हास होणे
dwindle कोसळणे, घसरणे
lessen कमी करणे, कमी होणे
reduce उतरवणे, उतरणे

**abatement,** *n.* **घट** (स्त्री.), **घटणे** (न.)

**abbreviation,** *n.* **संक्षेप** (पु.)

**ability,** *n.* **१ समर्थता** (स्त्री.) **२ क्षमता** (स्त्री.)

**ability-to-pay,** *n.* (i.e. ability to pay tax—a principle of taxation—that the amount of tax payable by a person should depend upon his ability to pay) **करक्षमता** (स्त्री.) (कर देण्याची क्षमता)

**"ability-to-pay" theory of taxation,** (*also* **faculty theory of taxation**) **कराधानाचा "करक्षमता" सिद्धांत**

**able,** *adj.* **१ समर्थ** २ (as, competent) **सक्षम**

**able-bodied,** *adj.* **धडधाकट**

**abnormal,** *adj.* **१ अपसामान्य २ असामान्य** (as in : abnormal situation असामान्य परिस्थिति)

**abnormal demand, अपसामान्य मागणी**

**abnormal profit, अपसामान्य लाभ**

**abolish,** *v.t.* १ (set aside, put an end to) **निरास करणे, नाहीसा करणे २ नष्ट करणे**

**abolition,** *n.* **१ निरास** (पु.), **नाहीसा करणे** (न.) **२ नाश** (पु.)

**above par, अधिमूल्याने, अधिमूल्यावर**

**above par value,** *n.* **अधिमूल्य** (न.)

**abrasion,** *n.* **घर्षण** (न.)

**abridgement,** *n.* **संक्षेप** (पु.)

**absenteeism,** *n.* **१ अनुपस्थिति** (स्त्री.) **२ अनुपस्थिति पद्धति** (स्त्री.)

**absentee landlord, १ अन्यत्रवासी क्षेत्रस्वामी, अन्यत्रवासी भूस्वामी, अन्यत्रवासी जमीन मालक २ अनुपस्थित क्षेत्रस्वामी, अनुपस्थित भूस्वामी, अनुपस्थित जमीन मालक**

**absolute,** *adj.* १ (not relational ; independent of arbitrary standards of measurement) **निरपेक्ष** २ (marked by freedom from restraint or control or free from conditional limitations) **संपूर्ण** ३ (operating or existing in full under all circumstances without variations or exceptions) **केवल ४ नितांत** (as in: absolute necessaries नितांत आवश्यकता)

**absolute monopoly,** (*also* **perfect monopoly**) **१ संपूर्ण मक्तेदारी, संपूर्ण एकाधिकार २ परम मक्तेदारी**

**absolute value, १ निरपेक्ष मूल्य २ केवल मूल्य**

**absolute wages, १ निरपेक्ष वेतन २ केवल वेतन**

**absorb,** *v.t.* १ (as, when a small company amalgamates with large one) **विलयन**

करून घेणे, अंतर्लयन करून घेणे २ (to take up e.g. by purchase, etc. or to take over) शोषून घेणे

**absorbing,** *adj.* अंतर्लयन करून घेणारा

**absorption,** *n.* १ अवशोषण (न.) २ विलयन (न.), अंतर्लयन (न.) *cf.* amalgamation ३ शोषण (न.)

**abstain,** *v.t.* दूर राहणे, अलग राहणे

**abstinence,** *n.* (as, endurance, forbearance) तितिक्षा (स्त्री.), भोगवर्जन (न.)

**abstinence theory of interest,** (*also* **agio theory of interest**) तितिक्षा व्याज सिद्धांत, भोगवर्जन व्याज सिद्धांत

**abstract,** *n.* १ विवरण (न.) २ गोषवारा (पु.) *adj.* १ संक्षिप्त, बिनतपशील २ (not concrete) अमूर्त ३ (as, applied to sciences) केवल, शुद्ध

**abstract of teller's receipts,** गणक जमा गोषवारा

**abstract of title,** हक्क विवरण

**accelerate,** *v.t. & i.* त्वरण करणे, त्वरण होणे

**accelerated,** *adj.* त्वरणित

**accelerated depreciation,** त्वरणित घसारा

**acceleration,** *n.* त्वरण (न.)

**acceleration coefficient** = **accelerator**

**acceleration principle,** त्वरण तत्त्व

**accelerator,** *n.* (*also* **acceleration coefficient**) १ (the ratio of increase or decrease in investment to an increase or decrease in income) त्वरण गुणांक (पु.) २ त्वरक (पु.)

**accept,** *v.t.* स्वीकृत करणे, स्वीकार करणे, स्वीकारणे

**acceptance,** *n.* १ स्वीकृति (स्त्री.), स्वीकार (पु.) २ (as, accepted draft, etc.) स्वीकृत धनाकर्ष (पु.) ३ (an accepted bill) स्वीकृत विपत्र (न.)

**clean acceptance** बिनशर्त स्वीकृति
**conditional acceptance** सशर्त स्वीकृति
**forged acceptance** बनावट स्वीकृति
**general acceptance** सामान्य स्वीकृति
**partial acceptance** आंशिक स्वीकृति
**qualified acceptance** विशेषित स्वीकृति
**unqualified acceptance** अविशेषित स्वीकृति

**acceptance credit,** (an authorisation given by a bank to a specified beneficiary to draw drafts upon the bank upto a specified amount) स्वीकृत पत

**acceptance for honour,** प्रतिष्ठार्थ स्वीकृति (प्रतिष्ठारक्षणार्थ स्वीकृति)

**acceptance house** = **accepting house**

**acceptance letter,** स्वीकारपत्र (न.), स्वीकृतिपत्र (न.)

**acceptance of a bill,** विपत्राची स्वीकृति, विपत्र स्वीकृति

**acceptance register,** स्वीकृति नोंदवही

**accepted bill,** स्वीकृत विपत्र

**accept for honour,** प्रतिष्ठार्थ स्वीकार करणे (प्रतिष्ठारक्षणार्थ स्वीकार करणे)

**accepting house,** (*also* **acceptance house**) स्वीकार गृह

**acceptor,** *n.* स्वीकर्ता (पु.)

**acceptor for honour,** प्रतिष्ठार्थ स्वीकर्ता (प्रतिष्ठारक्षणार्थ स्वीकर्ता)

**acceptor's ledger,** स्वीकर्त्याची खातेवही

**accept under protest,** प्रतिसाक्षन करून स्वीकार करणे, प्रतिसाक्षित करून स्वीकार करणे

**accession,** *n.* अनुवृद्धि (स्त्री.)
*cf.* accretion उपवृद्धि
growth अभिवृद्धि
increase वृद्धि, वाढ

**accessories,** *n. pl.* उपसाधने (न.अ.व.)

**accessory,** *n.* १ उपसाधन (न.) २ सहायक (सा.) *adj.* उपसाधक, सहायक

**accident,** *n.* अपघात (पु.), दुर्घटना (स्त्री.)

**accident benefit,** अपघात लाभ

**accident insurance,** अपघात विमा
**accident risk,** अपघाताची जोखीम
**accommodation bill,** (*also* acdommodation paper *or* kite) निभाव विपत्र, सोय हुंडी
**accommodation note,** निभाव चिठ्ठी
**accommodation paper** = accommodation bill
**accommodation party,** निभावकर्ता (पु.)
**accord,** *n.* ऐकमत्य (न.), संवाद (पु.)
**accord and satisfaction,** (a term used of a contract which has been discharged by mutual agreement of the parties concerned) ऐकमत्य व पूर्ति
**account,** *v.t.* १ (to place to one's account) खाती लिहिणे २ (to render or give an account) हिशेब देणे ३ (to give a reason or an explanation) खुलासा करणे, स्पष्टीकरण देणे ४ *Bookkeeping* लेखांकन करणे, जमाखर्च ठेवणे
*n.* १ (a statement of the transactions during a fiscal period showing the resulting balance) लेखा (पु.) २ (as, a record of debit and credit entries chronologically posted to ledger page, etc.) खाते (न.) ३ हिशेब (पु.), गणन (न.)

१

adjusting account समायोजन लेखा
audited account परीक्षित लेखा
capital account भांडवली लेखा
commercial account वाणिज्य लेखा
cost account परिव्यय लेखा
deficiency account १ तूट लेखा २ न्यून लेखा
departmental account विभागीय लेखा
deposit account निक्षेप लेखा, ठेव लेखा
exchange account विनिमय लेखा
final call account अंतिम मागणी लेखा
goods account माल लेखा
government account शासकीय लेखा
income and expenditure account आय व्यय लेखा
initial account प्रारंभिक लेखा
nominal account नामित लेखा
personal account व्यक्तिगत लेखा
profit and loss account नफा तोटा लेखा, लाभालाभ लेखा
*pro forma* account प्रपत्र लेखा
public account लोक लेखा
real account संपत्ति लेखा
receipt and payment account प्राप्ति व प्रदान लेखा
remittance account वित्तप्रेषण लेखा
revenue account आगम लेखा
sales account विक्री लेखा
sterling account स्टर्लिंग लेखा
stock account १ संग्रह लेखा २ निधि लेखा
subsidiary account दुय्यम लेखा
suspense account निलंबन लेखा
trading account व्यापार लेखा

२

bank account बँक खाते
creditor's account धनकोचे खाते
current account चालू खाते
dead account बंद खाते, बंद पडलेले खाते
dead stock account जडवस्तु संग्रह खाते
debtor's account ऋणकोचे खाते
deposit account ठेव खाते
fixed deposit account नियत ठेव खाते
insured savings deposit account विमाबद्ध बचत ठेव खाते, विमा उतरवलेले बचत ठेव खाते
joint account संयुक्त खाते
savings account बचत खाते
**accountancy,** *n.* लेखाशास्त्र (न.)
**accountant,** *n.* लेखापाल (सा.), हिशेबनीस (सा.)

**account-book,** *n.* लेखापुस्तक (न.), वहीखाते (न.)

**account day,** लेखा दिन

**accounting,** *n.* लेखांकन (न.)

**accounting price,** (*also* **shadow price**) (price that more accurately reflects the 'real' scarcities of the productive agents than the market price) छाया किंमत

**accounting rate of interest = shadow rate of interest**

**account ledger,** लेखा खातेवही

**account payee,** (A/c payee) आदात्याच्या खात्यावरच जमा

**account sale** (*or* **account sales**), (it gives full details of the transaction—the amount sold, the price obtained, the expenses incurred and the agent's commission. It is supplied by the agent to his principal) विक्रय विवरण लेखा

**accounts and finance section,** लेखा व वित्त विभाग

**accretion,** *n.* १ उपवृद्धि (स्त्री.) *cf.* accession २ आंगिक वाढ (स्त्री.)

**accrue,** *v.i.* १ (to come by way of increase or addition—usu. with *to* or *from*) उपार्जित होणे २ (to be periodically accumulated in the process of time whether as an increase or decrease) प्रोद्भूत होणे

**accrued,** *adj.* १ उपार्जित २ प्रोद्भूत

**accrued income,** प्रोद्भूत आय, प्रोद्भूत मिळकत

**accrued interest,** प्रोद्भूत व्याज

**accumulate,** *v.t.* & *i.* (to heap up in a mass; to pile up; to grow or increase in quantity or number) संचय करणे, संचय होणे, साचवून ठेवणे, साचवणे

*cf.* amass साठवणे, साठणे

hoard अपसंचय करणे, अपसंचय होणे

**accumulated,** *adj.* संचित, संचायित, संचय करून ठेवलेला, संचित झालेला

**accumulating,** *adj.* संचयी

**accumulating society,** (a type of friendly society which is centrally organised in contrast to the locally independent affiliated orders) संचयी समाज

**accumulation,** *n.* १ संचय (पु.) २ (the action or process of accumulating; the state of being or having accumulated) संचयन (न.), साचणी (स्त्री.), साचवणी (स्त्री.)

**accumulative,** *adj.* संचयी

**acid-test ratio,** (*also* **current ratio**) निकषित गुणोत्तर

**acknowledge,** *v.t.* १ अभिस्वीकार करणे, अभिस्वीकृत करणे २ पोच देणे

**acknowledged,** *adj.* १ अभिस्वीकृत २ पोच दिलेला

**acknowledgment** (*or* **acknowledgement**), *n.* १ अभिस्वीकृति (स्त्री.) २ पोच (स्त्री.)

**acknowledgment due,** पोच देय

**A/c payee,** (*abbr.* of account payee) आदाता खात्यावरच (आदात्याच्या खात्यावरच जमा)

**A/c payee crossing,** आदाता रेखन

**acquire,** *v.t.* संपादन करणे

**acquisition,** *n.* संपादन (न.)

**acquittance,** *n.* १ (release or full discharge from a debt, etc.) अभिमुक्ति (स्त्री.) २ (a writing evidencing a discharge; a receipt in full) पावती (स्त्री.)

**act,** *n.* १ कृत्य (न.), कृति (स्त्री.) २ (as, of legislature) अधिनियम (पु.)

**action,** *n.* १ कार्य (न.), कृति (स्त्री.) २ (operation) क्रिया (स्त्री.) ३ (as, proceedings in court of law) कारवाई (स्त्री.)

**active,** *adj.* १ (as, having practical operation or results) **प्रत्यक्ष** (as in : active delivery प्रत्यक्ष पोचवणी) २ (as, characterised by action rather than by contemplation or speculation) **सक्रिय** (as in: active partner सक्रिय भागीदार) ३ (as, marked by present operation, transaction, movement or use) **क्रियाशील** (as in : active deposit क्रियाशील ठेव) ४ *of markets* **तेज**
**active balance,** **व्यवहारार्थ रोख शिल्लक, सक्रिय रोख शिल्लक**
**active balance of payments = favourable balance of payments**
**active bond,** **चालू व्याजी रोखा**
**active capital,** **क्रियाशील भांडवल**
**active circulation,** (out of the total bank notes issued, those actually in circulation with the public or with the banks) **क्रियाशील परिचलन**
**active delivery,** **साक्षात पोचवणी**
**active deposit,** **सजीव ठेव**
**active market,** १ **तेज बाजार** २ **सजीव बाजार** ३ **क्रियाशील बाजार**
**active money,** १ **क्रियाशील मुद्रा** २ **क्रियाशील पैसा**
**active partner,** **क्रियाशील भागीदार**
**activity,** *n.* १ (as, natural or normal function or operation, such as, activity on stock exchange, etc.) **कार्य** (न.), **काम** (न.), **व्यवहार** (पु.) २ (often used in *pl.*—as business activities, etc.) **व्यवहार** (पु.), **कार्ये** (न.अ.व.), **घडामोडी** (स्त्री.अ.व.)
**Act of God,** **दैवी आपत्ति**
**act of honour,** १ (an acceptance or payment for honour of a protested bill of exchange) **प्रतिष्ठार्थ स्वीकृति, प्रतिष्ठार्थ प्रदान** २ (an instrument reciting such protest and acceptance or payment) **मानलेख** (पु.)

**actual,** *adj.* **प्रत्यक्ष, वास्तविक**
**actual cost,** (cost based on most factual allocation of historical cost factors—as compared to *estimated cost*, *standard cost*) **वास्तविक परिव्यय**
**actual money,** **वास्तविक पैसा**
**actual notice,** **प्रत्यक्ष नोटीस**
**actual price,** **प्रत्यक्ष किंमत**
**actual tare,** (वाहनाचे, वेष्टनाचे, इत्यादि) **प्रत्यक्ष निव्वळ वजन**
**actual total loss,** **एकूण वास्तविक हानि**
**actuarial,** *adj. Insurance* १ **विमागणितीय, विमागणित–** २ **विमागणितशास्त्रीय**
**actuarial valuation,** **विमागणितीय मूल्यांकन**
**actuary,** *n. Insurance* (one trained in mathematics and statistics whose business it is to calculate insurance, annuity premiums, reserves, dividends, etc.) **विमागणिती** (सा.)
**add,** *v.t. & i.* १ **भर घालणे, भर पडणे** २ **बेरीज करणे**
**adding machine,** **बेरीज यंत्र**
**addition,** *n.* १ **भर** (स्त्री.) २ *Math.* **बेरीज** (स्त्री.)
  **compound addition** **संयुक्त बेरीज**
  **cross addition** **आडवी बेरीज**
  **double column addition** **द्विस्तंभी बेरीज**
  **long addition** **उभी बेरीज**
  **mental addition** **तोंडी बेरीज**
  **simple addition** **साधी बेरीज**
**additional,** *adj.* १ **अधिक, जास्तीचा** २ (as, extra) **जादा, अतिरिक्त**
**additional banking facilities,** **बँकेच्या जादा सोयी**
**additional capital,** **अतिरिक्त भांडवल.**
**additional invoice,** **अतिरिक्त बीजक**
**adeem,** *v.t.* (to revoke or satisfy by redemption) **रद्द करणे**

**ademption,** *n.* रद्द करणे (न.), रद्द होणे (न.)

**adequate personal security,** पुरेशी व्यक्तिगत प्रतिभूति

*ad hoc,* तदर्थ

*ad hoc* **licence,** तदर्थ अनुज्ञप्ति

*ad hoc* **securities,** तदर्थ रोखे

*ad hoc* **treasury bill,** १ तदर्थ राजकोष विपत्र २ तदर्थ कोषागार विपत्र

**adjourn,** *v.t. & i.* स्थगित करणे, स्थगित होणे

**adjourned,** *adj.* स्थगित

**adjournment,** *n.* १ स्थगन (न.), तहकुबी (स्त्री.) २ (time or interval for which a body adjourns) स्थगनकाल (पु.)

**adjudicate,** *v.t.* अभिनिर्णय करणे

**adjudication,** *n.* १ अभिनिर्णय (पु.) *cf.* conciliation २ (the act or process of adjudicating) अभिनिर्णय करणे (न.)

**adjudication order,** *Bankruptcy* (a court order declaring the debtor to be a bankrupt, etc.) अभिनिर्णय आदेश

**adjust,** *v.t. & i.* १ (to make correspondent or conformable; to bring to a more satisfactory state; to come into conformity, etc.) समायोजन करणे, समायोजन होणे २ (generally) जुळवून घेणे, जमवून घेणे

**adjustable,** *adj.* १ समायोज्य २ जुळवून घेण्यासारखा, जमवून घेण्यासारखा

**adjustable currency,** समायोज्य चलन

**adjusted,** *adj.* १ समायोजित २ जुळवून घेतलेला, जमवून घेतलेला

**adjusting,** *adj.* समायोजक, समायोजन–

**adjusting account,** समायोजन लेखा

**adjusting entry,** समायोजन नोंद, समायोजक नोंद

**adjustment,** *n.* १ (as, of accounts, entries, etc.) समायोजन (न.) २ जुळवून घेणे (न.), जमवून घेणे (न.)

**administer,** *v.t. & i.* १ प्रशासन करणे २ (as, a fund, property, etc.) प्रबंध करणे, कारभार पाहणे ३ (as, law, act, etc.) अंमलबजावणी करणे

**administered prices,** प्रबंधित किंमती

**administration,** *n.* १ प्रशासन (न.) २ (of public debt, property, etc.) प्रबंध (पु.), कारभार (पु.), व्यवस्था (स्त्री.) ३ (of laws, acts, etc.) अंमलबजावणी (स्त्री.) ४ *Law* (right of management conferred by what are called letters of administration) प्रबंधाधिकार (पु.)

**administration chart,** प्रशासन तक्ता

**administration of public debt,** लोक ऋणाचा कारभार, लोक ऋणाची व्यवस्था

**administrative,** *adj.* प्रशासनिक, प्रशासकीय, प्रशासन–

**administrative section,** प्रशासनिक शाखा

**administrator,** *n.* १ प्रशासक (सा.) २ (of a will) प्रबंधक (सा.)

**admission,** *n.* १ प्रवेश (पु.) २ अनुज्ञा (स्त्री.) ३ कबुली (स्त्री.), स्वीकार (पु.), स्वीकृति (स्त्री.)

**admission card,** प्रवेशपत्रिका (स्त्री.)

**admission fee,** प्रवेश फी

**admit,** *v.t. & i.* १ (to allow to enter; to let in) प्रवेश देणे २ दाखल करून घेणे ३ (to confess) कबूल करणे ४ (to acknowledge) स्वीकार करणे ५ (to have space enough *for*) जागा असणे

**adult,** *n.* प्रौढ (सा.)
*adj.* प्रौढ

**adulteration,** *n.* अपमिश्रण (न.), भेसळ (स्त्री.)

**adult franchise,** प्रौढ मताधिकार

**adult suffrage,** १ प्रौढ मताधिकार २ प्रौढ मतदान

*ad valorem*, (in proportion to value) **यथा-मूल्य, मूल्यानुसार, मूल्यानुसारी** (*of a tax on property, etc.*—levied according to *assessed value* यथामूल्य; *of a tax on goods, etc.*—imposed at a rate percent of the value as stated in invoice rather than as a specific sum for a given quantity or number मूल्यानुसार, मूल्यानुसारी)

*ad valorem* **duty, मूल्यानुसार शुल्क**

*ad valorem* **import duty, मूल्यानुसार आयात शुल्क**

*ad valorem* **tax, मूल्यानुसार कर**

**advance,** *v.t. & i.* **अग्रिम देणे,** (पैसे, रक्कम, वगैरे) **आगाऊ देणे**

*n.* (a payment beforehand or money or value supplied beforehand) **अग्रिम** (न.), **आगाऊ रक्कम** (स्त्री.)

*adj.* **अग्रिम, आगाऊ**

**advanced accountancy, प्रगत लेखाशास्त्र**

**advanced banking, प्रगत बँक व्यवसाय, प्रगत अधिकोषण**

**advancement,** *n. Law* **प्राग्दायांश** (पु.)

**advance payment, आगाऊ भरणा**

**advance tax, अग्रिम कर**

**advantage,** *n.* १ **फायदा** (पु.) २ **लाभ** (पु.) ३ (as, good, avail, use) **उपयोग** (पु.) ४ (superiority, precedence) **वर्चस्व** (न.)

**adventurer,** *n.* (one that engages or shares in commercial enterprises of considerable risk for profit esp. in foreign countries) **उद्यमी** (सा.)

**adverse,** *adj.* **प्रतिकूल**

**adverse balance, प्रतिकूल शेष**

**adverse possession, प्रतिकूल कब्जा**

**advertise,** *v.t. & i.* १ **जाहिरात देणे** २ **जाहिरात करणे**

**advertisement,** *n.* **जाहिरात** (स्त्री.)

**advertisement account, जाहिरात लेखा**

**advertising,** *n.* १ **जाहिरात देणे** (न.) २ **जाहिरात करणे** (न.) ३ **जाहिरातबाजी** (स्त्री.) (as in : competitive advertising स्पर्धात्मक जाहिरातबाजी)

**advice,** *n.* (a formal or official notice sent by one person or office to another concerning a business transaction) **सूचना** (स्त्री.)

**advice book, सूचना पुस्तक**

**" advice fate ",** (a banking term used in connection with cheques) **" परिणाम सूचनार्थ "**

**advice note = advice slip, सूचनापत्र** (न.)

**advise,** *v.t.* (to give information or notice to) **सूचना देणे, कळवणे**

**adviser = advisor,** *n.* **सल्लागार** (सा.)

**advisory,** *adj.* **सल्लागार–**

**advisory board, सल्लागार मंडळ**

**advisory committee, सल्लागार समिति**

**affairs,** *n. pl.* १ **कारभार** (पु.), **व्यवहार** (पु.) २ **घडामोडी** (स्त्री.अ.व.) (as in : world affairs जागतिक घडामोडी)

**affluent,** *adj.* **संपन्न**

**affluent society,** (*also* **opulent society**) (a term used to denote the high standard of living achieved in many countries) **संपन्न समाज**

**affreightment,** *n.* १ (mercantile lease of a vessel under which it remains in charge of the owners) **भाडेपट्टा** (पु.) २ (act of hiring a vessel under such a lease) **भाड्याने घेणे** (न.), **भाड्याने देणे** (न.)

**a fortiori, सुतराम्**

**" after date ", तारखेनंतर**

**afterdate bill, पश्चातदिनांकित विपत्र**

**afterdated,** *adj.* **पश्चातदिनांकित, नंतरची तारीख टाकलेला**

**after sales service, विक्रयोत्तर सेवा**

after sight, दर्शनोत्तर
against all risks, (*short* AAR—the most comprehensive type of marine insurance policy) सर्व जोखमी (स. जो.)
age admission, वय स्वीकार
age distribution of capital, कालनियत भांडवल वितरण
agency, *n.* अभिकरण (न.), एजन्सी (स्त्री.)
agency charges, अभिकरण खर्च, एजन्सी खर्च
agency houses, अभिकरण संस्था
agenda, *n. pl.* (*sing.* agendum) कार्यसूची (स्त्री.)
agent, *n.* १ अभिकर्ता (पु.), एजंट (सा.) *cf.* representative २ कारक (पु.) (as in : agents of production उत्पादनाचे कारक) ३ (as, a business representative) प्रतिनिधि (सा.)
auctioneer agent लिलाव अभिकर्ता, लिलाव एजंट
clearing agent १ समाशोधन अभिकर्ता, वटवणी अभिकर्ता २ निष्कासन अभिकर्ता
commission-agent अडत्या, कमिशन एजंट
*del credere* agent आश्वासक अभिकर्ता, आश्वासक एजंट
exporting agent निर्यात अभिकर्ता, निर्यात एजंट
forwarding agent अग्रेषण अभिकर्ता, अग्रेषण एजंट
general agent सामान्य अभिकर्ता, सर्वसाधारण अभिकर्ता
importing agent आयात अभिकर्ता, आयात एजंट
mercantile agent वाणिज्य अभिकर्ता, वाणिज्य एजंट
particular agent विशेष अभिकर्ता, विशेष एजंट
sole agent एकमेव अभिकर्ता, एकमेव एजंट
travel agent प्रवास अभिकर्ता, प्रवास एजंट
travelling agent फिरता अभिकर्ता, फिरता एजंट
underwriter agent हमीदार अभिकर्ता, हमीदार एजंट
agent's ledger, अभिकर्त्याची खातेवही, एजंटाची खातेवही
agents of production = factors of production
age-specific fertility rate, वयविशिष्ट प्रसवदर
age-specific mortality rate, वयविशिष्ट मृत्यु प्रमाण
age-structure, *n.* वयसंरचना (स्त्री.)
aggregate, *v.t. & i.* एकुणात करणे, एकुणात होणे
*n.* एकुणात (स्त्री.)
*adj.* एकूण
aggregate demand, एकत्रित मागणी
aggregate demand function, एकत्रित मागणीचा अनुवर्त
aggregate money income, पैशातील एकूण प्राप्ति, एकूण मुद्रारूप प्राप्ति
aggregate saving, एकूण बचत
aggregate supply, एकूण पुरवठा
aggregate supply function, एकूण पुरवठा अनुवर्त
aggregate value, एकूण मूल्य
agio, *n.* १ (as, a payment for time preference) तितिक्षा देय (न.), उपभोगवर्जन अधिमान देय (न.) २ (a charge made for exchanging a currency of one country for that of another. When a currency has depreciated, the agio represents the difference अंतर between nominal and actual value मूल्य of currency) मूल्यांतर (न.)

**agiotage,** *n.* १ (speculation in stock-exchange securities) शेअर बाजार सट्टा (पु.) २ (speculation in foreign exchange) विदेशी चलन सट्टा (पु.)
**agio theory of interest = abstinence theory of interest**
**Agmark,** *n.* (a mark indicating the thing as a standard product) ॲगमार्क (पु.)
**agrarian,** *adj.* कृषिभूमिविषयक, कृषिभूमि–
**agrarian revolution,** कृषिभूमि क्रांति
**agreement,** *n.* १ संमति (स्त्री.) २ (the written instrument that is the evidence of an agreement) संमतिपत्र (न.) ३ (the act of agreeing or coming to a mutual arrangement ; oneness of opinion, etc.) मेळ (पु.) *cf.* compromise ४ (a contract duly executed and legally binding on the parties entering into it) करार (पु.)
*cf.* contract संविदा
covenant प्रसंविदा
indenture करारनामा
pact करार
**agreement bond,** १ करारनामा (पु.) २ संमतिनामा (पु.)
**agreement note,** करारपत्र (न.)
**agreement of balance,** शिलकीचा मेळ
**agricultural,** *adj.* कृषिसंबंधी, कृषि–, शेतीसंबंधी, शेतकीसंबंधी
**agricultural bank,** कृषि बँक, कृषि अधिकोष
**agricultural co-operative credit society,** कृषि सहकारी पत संस्था
**agricultural credit,** कृषि पत, शेतकीविषयक पत
**agricultural economics,** कृषि अर्थशास्त्र
**agricultural economy,** कृषि अर्थव्यवस्था
**agricultural engineering,** कृषि अभियांत्रिकी
**agricultural finance,** कृषि वित्तव्यवस्था
**agricultural income,** कृषि आय, कृषि प्राप्ति
**agricultural labour,** कृषि कामगार, कृषि श्रमिक
**agricultural marketing,** कृषि विपणन, कृषिविषयक खरेदीविक्री
**agricultural produce,** कृषि उपज, कृषि उत्पादन
**agricultural production,** कृषि उत्पादन
**agricultural products,** कृषि पदार्थ
**Agricultural Refinance Corporation,** कृषि पुनर्वित्तव्यवस्था महामंडळ
**agricultural stage,** कृषि अवस्था
**agricultural wage board,** कृषि वेतन मंडळ
**agriculture,** *n.* १ कृषि (स्त्री.), शेती (स्त्री.) २ (as, a science) कृषिशास्त्र (न.)
**agriculturist,** *n.* कृषक (पु.), शेतकरी (पु.)
**agro-based industries,** कृषि आधारित उद्योग
**aid,** *v.t. & i.* साह्य करणे, मदत देणे, सहाय्यभूत होणे, मदत होणे
*n.* १ सहाय्य (न.), साह्य (न.) २ साधन (न.)
**aids to trade = ancillaries to trade**
**aid with strings,** हेतुगर्भ सहाय्य
**airborne,** *adj.* हवाई
**airborne-trade,** *n.* हवाई व्यापार (पु.)
**air letter,** हवाई पत्र
**air-mail,** *n.* हवाई डाक (स्त्री.)
**air transport,** हवाई परिवहन
**airways,** *n. pl.* विमानमार्ग (पु.अ.व.), हवाईमार्ग (पु.अ.व.)
**airworthiness,** *n.* हवाई प्रवासक्षमता (स्त्री.)
**airworthy,** *adj.* हवाई प्रवासक्षम
**alien,** *n.* १ अन्यदेशीय (सा.) २ (a person of another family, race or place) परका (पु.)
**allocate,** *v.t.* वाटप करणे, विल्हेवार वाटप करणे
**allocation,** *n.* १ वाटप (न.), वाटणी (स्त्री.) २ विल्हेवार वाटप (न.)

**allonge,** *n.* (a slip of paper attached to a bill of exchange or similar document to provide space for additional endorsements) **विपत्र सहपत्र** (न.)

**allot,** *v.t.* १ (to assign as a portion or lot) **नेमून देणे** २ (to parcel out in parts or portions or to each individual concerned ; to apportion) **नियतवाटप करणे, भागवाटप करणे**

**allotment,** *n.* १ **नियतवाटप** (न.), **भागवाटप** (न.) २ **नियत रक्कम** (स्त्री.)

**allotment book, भागवाटप पुस्तक**

**allotment letter, भागवाटप पत्र**

**allotment money, नियतवाटप रक्कम, भागवाटप रक्कम**

**allotment of shares, भागवाटप** (न.)

**allotted fund, नियत निधि**

**allottee,** *n.* **नियतभागी** (सा.)

**allowance,** *n.* १ **भत्ता** (पु.) २ (something that is allowed, e.g. a share or portion allotted or granted as, allowances for depreciation) **सवलत** (स्त्री.), **सूट** (स्त्री.)

*cf.* concession सवलत
deduction वजात
percentage टक्केवारी, शेकडेवारी
remission सूट

**alloy,** *n.* **संमिश्र** (न.), **संमिश्र धातु** (पु., स्त्री.)

**alter,** *v.t. & i.* **फेरफार करणे, फेरफार होणे**

**alterable,** *adj.* **फेरफारयोग्य**

**alteration,** *n.* **फेरफार** (पु.)

**alteration of articles, नियमावलीतील फेरफार**

**alternate,** *adj.* **एक सोडून एक, एकांतरित, एकांतर–**

**alternately,** *adv.* **आलटून पालटून, एकांतरित रीतीने**

**alternation memorandum, एकांतरण ज्ञापन**

**alternation payee, पर्यायी आदाता**

**alternative,** *n.* १ (a choice between two things) **विकल्प** (पु.), **पर्यायी वस्तु** (स्त्री.) २ (one of more than two possibilities) **पर्याय** (पु.)

*adj.* १ **वैकल्पिक** २ **पर्यायी**

**alternative cost = opportunity cost**

**alternative demand,** १ **वैकल्पिक मागणी** २ **पर्यायी मागणी**

**alternative drawee,** १ **वैकल्पिक आदेशिती** २ **पर्यायी आदेशिती**

**alternative holder,** १ **वैकल्पिक धारक** २ **पर्यायी धारक**

**alternative standard, पर्यायी प्रमाण, पर्यायी मान**

**alternative wants, पर्यायी गरजा**

**amalgamate,** *v.t. & i.* **समामेलन करणे, समामेलन होणे**

**amalgamated,** *adj.* **समामेलित**

**amalgamated banking company, समामेलित बँक व्यवसाय कंपनी**

**amalgamation,** *n.* **समामेलन** (न.)

*cf.* absorption विलयन, अंतर्लयन
assimilation आत्मसात करणे
combination संयुक्तीकरण
incorporation समावेशन, अंतर्भाव
integration एकीकरण
merger विलीनीकरण

**amass,** *v.t. & i.* (to collect for oneself ; to gather as one's own ; to come together. It stresses the size of accumulation usu. of things of value ; it implies rather rapid acquisition) **साठवणे, साठणे** *cf.* accumulate

**amend,** *v.t.* १ **दुरुस्ती करणे, दुरुस्ती सुचवणे** २ **सुधारणे**

**amendatory,** *adj.* १ **दुरुस्ती करणारा, दुरुस्ती सुचवणारा** २ **सुधारात्मक**

**nended,** *adj.* १ दुरुस्ती केलेला २ सुधारलेला

**nendment,** *n.* १ दुरुस्ती (स्त्री.) २ सुधारणा (स्त्री.)

**nends,** *n. pl.* प्रतिपूर्ति (स्त्री.) *cf.* compensation

**nortisation,** *n.* (the provision for the gradual extinction of a debt by means of a sinking fund) कर्जफेडीची तरतूद (स्त्री.)

**mortise,** *v. t.* कर्जफेडीची तरतूद करणे

**mount,** *n.* १ राशि (स्त्री.), रक्कम (स्त्री.) २ (as, a quantity) प्रमाण (न.)

**amounts differ "** (a term used of a cheque payment of which has been refused because the amounts in words and figures do not agree) (अक्षरी व अंकी) 'राशि भिन्न'

**nalyse,** *v.t.* विश्लेषण करणे

**nalyser,** *n.* विश्लेषक (सा.)

**nalysis,** *n.* विश्लेषण (न.)

**nalyst,** *n.* विश्लेषक (सा.)

**nalytic = analytical,** *adj.* विश्लेषणात्मक, वैश्लेषिक, विश्लेषण–

**nalytical method of economics,** अर्थशास्त्राची विश्लेषणात्मक पद्धति

**nalytical petty cash-book,** खातेवार किरकोळ रोकडवही, खातेवार किरकोळ जमाखर्च वही

**nchorage,** *n.* (duty imposed for anchoring) नांगरपट्टी (स्त्री.)

**ncillaries to trade,** (*also* aids to trade) व्यापार सहायके

**ncillary,** *n.* सहायक (न.) (वस्तू, गोष्टी, वगैरे)

*adj.* सहाय्यभूत

**ngle,** *n.* १ कोन (पु.) २ (as, point of view) दृष्टिकोन (पु.)

**nnounce,** *v.t.* १ घोषणा करणे २ (to make known) जाहीर करणे

**announced,** *adj.* १ घोषित २ जाहीर केलेला

**announced dividend,** घोषित लाभांश

**annual,** *adj.* वार्षिक

**annual abstract of statistics,** आकडेवारीचा वार्षिक गोषवारा

**annual accounts,** १ वार्षिक लेखे २ वार्षिक हिशेब

**annual bearing,** वार्षिक

**annual charge,** वार्षिक भार, वार्षिक आकार

**annual financial statement,** वार्षिक वित्तीय विवरणपत्र

**annual general meeting,** वार्षिक सर्वसाधारण सभा

**annual instalment of capital,** भांडवलाचा वार्षिक हप्ता

**annual list of members,** वार्षिक सदस्य सूची

**annually,** *adv.* दरवर्षी

**annual meeting,** वार्षिक सभा

**annual returns,** १ वार्षिक विवरणे २ वार्षिक प्राप्ति

**annual verification,** वार्षिक पडताळणी

**annuitant,** *n.* वर्षासन घेणारा (पु.), वार्षिकीधारक (सा.)

**annuity,** *n.* वर्षासन (न.), वार्षिकी (स्त्री.)
- certain annuity निश्चित वार्षिकी
- complete annuity परिपूर्ण वार्षिकी
- contingent annuity आकस्मिक वार्षिकी
- deferred annuity स्थगित वार्षिकी
- immediate annuity तात्काल वार्षिकी
- life-annuity आजीव वार्षिकी
- perpetual annuity अखंड वार्षिकी
- terminable annuity समाप्तियोग्य वार्षिकी

**annuity bond,** वार्षिकी बंधपत्र

**annuity certificate,** वर्षासन प्रमाणपत्र, वार्षिकी प्रमाणपत्र

**annuity formula,** वार्षिकी काढण्याचे सूत्र, वार्षिकी निर्धारण सूत्र

**annuity fund,** वर्षासन निधि, वार्षिकी निधि
**annuity instalment,** वार्षिकी हप्ता
**annuity system,** वार्षिकी पद्धति
**anomalous,** *adj.* असंगत
**anomalous mortgage,** *Law* अनामी गहाण
**anomaly,** *n.* असंगति (स्त्री.)
**antedate,** *v.t.* पूर्वदिनांकित करणे, मागील तारीख टाकणे
**antedated,** *adj.* पूर्वदिनांकित, मागील तारीख टाकलेला
**antedated cheque,** पूर्वदिनांकित धनादेश
**anticipate,** *v.t.* प्रत्याशा करणे, अपेक्षा करणे
**anticipated,** *adj.* प्रत्याशित, अपेक्षित
**anticipated price,** प्रत्याशित किंमत
**anticipation,** *n.* प्रत्याशा (स्त्री.), अपेक्षा (स्त्री.)
**anticipation interest warrant,** प्रत्याशित व्याज अधिपत्र
**anticipatory revenue,** प्रत्याशित आगम, अपेक्षित महसूल
**anti-dumping,** *adj.* प्रतिमूल्यावपाती
**anti-dumping duty,** प्रतिमूल्यावपाती शुल्क
**anti-dumping legislation,** प्रतिमूल्यावपाती विधिविधान
**anti-dumping tariff,** प्रतिमूल्यावपाती प्रशुल्क
**anti-inflationary measure,** १ चलनवाढ-विरोधी उपाय, मुद्रास्फीति निवारण उपाय २ स्फीति निवारण उपाय
**anti-inflationary policy,** अतिवृद्धिविरोधी धोरण
**A. O. B.,** (*abbr.* of "Any Other Business") अ. वि. (अन्य विषय)
**apex,** *n.* १ शीर्ष (न.) २ शिखर (न.)
**apex bank,** शिखर बँक
**apex society,** शिखर संस्था
**appeal,** *v.t.* १ *Law* अपील करणे २ आवाहन करणे, प्रार्थना करणे
*n.* १ *Law* अपील (न.) २ आवाहन (न.), प्रार्थना (स्त्री.)
**applicability,** *n.* प्रयोज्यता (स्त्री.)
**applicable,** *adj.* प्रयोज्य, लागू होणारा
**applicant,** *n.* आवेदक (सा.), अर्जदार (सा.)
**application,** *n.* १ आवेदन (न.), आवेदन-पत्र (न.), अर्ज (पु.) २ लागू करणे (न.), लागू होणे (न.), प्रयुक्ति (स्त्री.) ३ उप-योजन (न.)
**application and allotment,** आवेदन व भाग-वाटप
**application book,** आवेदन पुस्तक
**application money,** आवेदन रक्कम
**applied,** *adj.* १ आवेदित २ (as opposed to 'pure') उपयोजित ३ (put to practical use ; engaged in for a utilitarian or contributory purpose) व्यावहारिक
**applied economics,** उपयोजित अर्थशास्त्र
**apply,** *v.t.&i.* १ आवेदन करणे, आवेदनपत्र देणे, अर्ज करणे २ लागू करणे, लागू होणे, प्रयुक्त करणे ३ (to use or employ for a particular purpose) उपयोजन करणे
**appoint,** *v. t.* १ नियुक्ती करणे, नेमणूक करणे *cf.* employ २ (as, a date) नियत करणे
**appointed,** *adj.* १ नियुक्त २ नियत
**appointee,** *n.* नियुक्त (सा.)
**appointment,** *n.* नियुक्ति (स्त्री.), नेमणूक (स्त्री.)
**appointment letter,** नियुक्ति पत्र
**apportion,** *v.t.* संविभाजन करणे
**apportioned,** *adj.* संविभाजित
**apportioned tax,** संविभाजित कर
**apportioning the liabilities,** दायित्वांचे संविभाजन, दायित्व संविभाजन
**apportionment,** *n.* संविभाजन (न.)
**appraisal,** *n.* मूल्यन (न.)
**appraise,** *v.t.* १ (to value) मूल्यन करणे *cf.* assess २ (to estimate the amount of) आगणन करणे

**appraisement,** *n.* १ मूल्यन (न.) *cf.* valuation २ आगणन (न.)
**appraiser,** *n.* मूल्यनिर्णेता (पु.)
**appreciable,** *adj.* १ उल्लेखनीय २ पुष्कळसा
**appreciably,** *adv.* उल्लेखनीय रीतीने
**appreciate,** *v. t. & i.* (to raise the value of ; increase the market price of ; to rise in value or quantity) अधिमूल्यन करणे, अधिमूल्यन होणे, मूल्यवृद्धी होणे
**appreciated,** *adj.* अधिमूल्यित, मूल्यवर्धित
**appreciation,** *n.* अधिमूल्यन (न.), मूल्यवृद्धि (स्त्री.)
**appreciation of currency,** चलनाचे अधिमूल्यन, चलन मूल्यवृद्धि
**apprentice,** *n.* शिकाऊ उमेदवार (सा.), शिक्षार्थी (सा.)
**apprenticeship,** *n.* शिकाऊ उमेदवारी (स्त्री.), शिक्षुवृत्ति (स्त्री.)
**appropriate,** *v. t.* १ (to set apart for or assign to a particular purpose or use in exclusion of all others) विनियोग करणे २ (in case of budget, accounts, etc.) विनियोजन करणे *adj.* १ समुचित २ योग्य
**appropriated,** *adj.* विनियोजित
**appropriation,** *n.* १ विनियोग (पु.) २ (in case of budget, accounts, etc.) विनियोजन (न.)
**appropriation account,** विनियोजन लेखा
**Appropriation Act,** विनियोजन अधिनियम
**Appropriation Bill,** विनियोजन विधेयक
**appropriation of funds,** निधींचे विनियोजन
**approval,** *n.* १ मान्यता (स्त्री.) २ पसंती (स्त्री.)
**approve,** *v. t.* १ मान्य करणे २ पसंत करणे
**approved,** *adj.* १ मान्य २ पसंत
**approved security,** १ मान्य प्रतिभूति २ मान्य रोखा ३ मान्य कर्जरोखा
**approved society,** मान्य संस्था
**approved surety,** १ मान्य जामीन २ मान्य जामीनदार
**approved underwriter,** मान्य हमीदार
**approximate,** *adj.* अदमासे, सुमारे
**approximately,** *adv.* अदमासे, सुमारे
**approximation,** *n.* अदमास (पु.)
**aptitude,** *n.* अभियोग्यता (स्त्री.)
**aptitude test,** अभियोग्यता चाचणी
**arable land,** कृषियोग्य जमीन
**arbiter,** *n.* १ *Law* (as, an arbitrator) लवाद (पु.) २ निर्णयकर्ता (पु.)
**arbitrable,** *adj.* लवादयोग्य
**arbitrage,** *n.* मूल्यांतर पणन (न.) (simultaneous purchase and sale पणन of the same or equivalent security, foreign exchange, etc. on the same or different markets in order to profit from price discrepancies मूल्यांतर)
**arbitrage of exchange,** विनिमय मूल्यांतर पणन
**arbitral tribunal,** लवाद न्यायाधिकरण
**arbitrate,** *v.t. & i.* १ (to judge as arbitrator) लवाद करणे, लवादी करणे *cf.* mediate २ *Law* (to decide by arbitration) लवादाने निर्णय करणे
**arbitration,** *n.* १ लवाद (पु.) *cf.* conciliation २ (the act of arbitrating) लवाद करणे (न.), लवादी करणे (न.)
**arbitration award,** लवाद निवाडा
**arbitration board,** लवाद मंडळ
**arbitration clause,** लवाद खंड
**arbitration proceedings,** लवाद कार्यवाही
**arbitrator,** *n.* लवाद (पु.)
**arc elasticity,** (the average degree of elasticity between two points on either demand curve or a supply curve) चाप लवचिकता

**area,** *n.* १ क्षेत्र (न.) २ *Math.* क्षेत्रफळ (न.), व्याप्तिक्षेत्र (न.)
**arithmetical,** *adj.* अंकगणितीय, गणित–
**arithmetical discount** = true discount
**arithmetic mean,** सरासरी (स्त्री.), गणितीय माध्य
**arithmetic progression** = arithmetical progression, *Math.* गणित श्रेढी
**arrange,** *v.t.* १ व्यवस्थित लावणे २ क्रमाने लावणे ३ व्यवस्था करणे
**arrangement,** *n.* १ व्यवस्था (स्त्री.) २ क्रम (पु.)
**array,** *n.* क्रमबंध (पु.), विन्यास (पु.)
**arrears,** *n. pl.* १ (a remainder or balance due) बाकी (स्त्री.) २ (of payments, etc.) थकबाकी (स्त्री.)
**arrears bill,** थकबाकी बिल
**arrivals,** *n. pl.* आगत वस्तू (स्त्री.अ.व.), आवक (स्त्री.)
**article,** *n.* १ वस्तु (स्त्री.), जिन्नस (पु.) २ (as, a separate clause or item in an enactment or agreement, etc.) अनुच्छेद (पु.) ३ (in *pl.*—as, of association, etc.) नियमावली (स्त्री.)
**articled clerk,** सनदी लेखापाल उमेदवार
**articles of apprenticeship,** उमेदवारी लेख
**articles of association,** संस्थापन नियमावली
**articles of comfort,** आराम वस्तू
**articles of luxury,** विलास वस्तू, चैनीच्या वस्तू
**articles of merchandise,** वाणिज्य वस्तू
**articles of partnership,** भागीदारी नियमावली
**artisan,** *n.* कारागीर (सा.)
**ascertain,** *v.t.* १ खात्री करून घेणे २ (to make certain) निश्चित करून घेणे
**ascertained goods,** १ खात्री करून घेतलेला माल २ निश्चित करून घेतलेला माल
**assembly,** *n.* (as, assembling a machine or its parts) जुळवणी (स्त्री.)
**assembly line,** १ (as, a stage of mass production during which parts of machine, etc. are progressively assembled) जुळवणी कार्य यंत्रणा २ *Mech.* जुळवणी यंत्रसमुच्चय ३ जुळवणी साखळी
**assembly market,** संकलन बाजार
**assembly phase,** (as, of production) जुळवणी अवस्था
**assent,** *v.t.* अनुमती देणे
*n.* अनुमति (स्त्री.)
**assess,** *v.t.* १ (to fix the amount of as a tax or fine) आकारणी करणे २ (to estimate the value of, esp. for taxation) मूल्यनिर्धारण करणे, निर्धारण करणे
*cf.* appraise मूल्यन करणे
determine निर्धारित करणे
estimate अंदाज करणे, अंदाजणे
evaluate मूल्यमापन करणे
**assessability,** *n.* १ आकारणीयोग्यता (स्त्री.) २ निर्धारणीयता (स्त्री.)
**assessable,** *adj.* १ आकारणीयोग्य २ निर्धारणीय
**assessed,** *adj.* १ आकारित, आकारलेला २ निर्धारित
**assessee,** *n.* १ करपात्र व्यक्ति (स्त्री.) २ निर्धारिती (सा.)
**assessment,** *n.* १ (act of assessing) आकारणी करणे (न.) २ मूल्यनिर्धारण (न.), निर्धारण (न.) *cf.* valuation ३ (the amount assessed) आकारणी (स्त्री.) ४ (as, a tax) निर्धारित कर (पु.)
**assessment of damages,** नुकसानभरपाईचे निर्धारण
**assessment of tax,** १ कर आकारणी २ कर निर्धारण
**assessor,** *n.* (one who makes an assessment) निर्धारक (सा.)
**assets,** *n. pl.* मत्ता (स्त्री.) *cf.* wealth

